**शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांची कार्यालयातील**
**उपस्थिती तपासणीसाठी अचानक भेटी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक समय-१००९/प्र.क्र.१८/०९/१८ (र. व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ जानेवारी, २०१०.

वाचा :- १) शासन परिपत्रक सा.प्र.वि क्र.अहत १६०८/ प्र.क्र ४७/०८/११-अ, दि.३/११/२००८
२) शासन परिपत्रक सा.प्र.वि क्र.अहत १६०८/ प्र.क्र ४७/०८/११-अ, दि.१८/११/२००८

**परिपत्रक**

शासकीय कर्मचाऱ्यांनी कार्यालयात वेळेवर उपस्थित रहावे तसेच कार्यालयाच्या कामकाजाची वेळ संपल्यानंतर कार्यालय सोडावे अशा सूचना यापूर्वी उपरोक्त संदर्भांकित परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. तालुका, जिल्हा व अन्य क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी कार्यालयात वेळेवर येत नाहीत किंवा कार्यालयीन कामकाजासाठी निर्धारित केलेल्या वेळेपूर्वी कार्यालय सोडतात, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी वेळेवर कार्यालयात येणे आणि कार्यालयीन उपस्थिती याबाबतच्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे, व हे तपासण्याची सर्वस्वी जबाबदारी कार्यालय प्रमुखाची आहे. कार्यालयीन वक्तशीरपणा व उपस्थिती बाबतच्या सूचनांची परिणामकारक अंमलबजावणी व्हावी याकरिता याबाबत आता खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

(१) कर्मचा-याच्या / अधिका-यांच्या कार्यालयीन उपस्थितीची संपूर्ण जबाबदारी कार्यालयप्रमुखाची राहील. त्यांनी कार्यालयीन उपस्थितीची काटेकोरपणे तपासणी करावी.

(२) कार्यालयीन उपस्थिती तपासण्यासाठी जिल्हाधिकारी अथवा त्यांनी नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांनी जिल्ह्यातील शासकीय कार्यालये, जिल्हा परिषद, नगरपालिका, स्थानिक राज्य संस्थाच्या कार्यालयांना अचानकपणे भेटी द्याव्यात.

(३) जिल्हाधिकारी अथवा त्यांनी नियुक्त केलेला अधिकारी यांनी जिल्ह्यातील शासकीय कार्यालयांमध्ये कार्यालयीन उपस्थिती संदर्भात दिलेल्या भेटीत उपस्थितीत अनियमितता आढळून आल्यास संबंधित कसुर करणा-या कर्मचारी/ अधिकारी यांची नावे संबंधित कार्यालय प्रमुखांना लेखी कळवावीत. त्यानुसार पुरेशा समर्थनाशिवाय उपस्थितीतील अनियमितता तपासुन कार्यालयप्रमुखानी संबंधिताविरुध्द आवश्यक योग्य ती कारवाई करावी.

(४) प्रत्येक कार्यालयप्रमुखाने आपापल्या कार्यालयीन उपस्थितीबाबतचा आणि त्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा अहवाल दर महिन्याला जिल्हाधिकारी यांच्याकडे पाठवावा.

२. या परिपत्रकान्वये उपरोल्लेखित शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.अहत-१६०८/प्र.क्र.४७/०८/११-अ, दिनांक ३ नोव्हेंबर, २००८ व क्र.अहत-१६०८/प्र.क्र.४७/०८/११-अ, दिनांक १८ नोव्हेंबर, २००८ अधिक्रमित करण्यात येत आहेत.

३. सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००११५१८४४२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(स. मा. साबळे)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
शासनाचे मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
*मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख / प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (कार्यासन १८)

---

* पत्राने

E/SO/C.R.१८.०९ GR

-------

एच-२३८७-१३।.